**शेतकरी सहकारी संघ मर्या., कोल्हापूर येथील सतत व समवर्ती लेखापरिक्षणाकरीता असलेल्या १४ अस्थायी पदांना सन २०१५-१६ करीता मुदतवाढ मिळणेबाबत-**

## महाराष्ट्र शासन
### सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
### शासन निर्णय क्रमांकः सपस-२०१५/प्र.क्र. १२५ / २४ स

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: १३ मे, २०१५

**वाचा :-**

1. **सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांकः राजस-१००८/प्र.क्र. ५३८/ ५ स, दि. ५ मे, २०११**
2. **सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र.आस्थापना/कक्ष-१/शेतकरी सह.संघ/मुदतवाढ/२४९/२०१४, दि. १९ मार्च, २०१४**
3. **सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांकः सपस- २०१४/ प्र.क्र. ५९ / २४ स, दि. ५ जुलै, २०१४**

**शासन निर्णय :-**

शेतकरी सहकारी संघ मर्या., कोल्हापूर येथील सतत व समवर्ती लेखापरिक्षणाकरीता असलेल्या १४ अस्थायी पदांना दिनांक २८ फेब्रुवारी, २०१५ पर्यंत उपरोक्त वाचा (३) मधील शासन निर्णय दिनांक ५ जुलै, २०१४ नुसार मुदतवाढ देण्यात आली होती. सदर १४ अस्थायी पदांना दिनांक १ मार्च, २०१५ ते दि. ३१ ऑगस्ट, २०१५ पर्यंत मुदतवाढ देण्याच्या प्रस्तावाला खालील अटींच्या अधिन राहून शासनाची मंजूरी देण्यात येत आहे :-

1. कार्यालय प्रमुखाचे पद वगळून उर्वरित सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीकरीता रिक्त असलेली पदे वगळण्यांत यावीत.
2. अस्थायी पदे विहित पध्दतीने भरलेली असावीत.
3. लेखापरिक्षण शुल्काची वसूली पूर्णत: होण्याबाबत दक्षता घेण्यात यावी.

दिनांक १ मार्च, २०१५ पासून ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०१५ पर्यंतच्या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात येणाऱ्या अस्थायी पदांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | विशेष लेखापरिक्षक, वर्ग-१ | १ |
| २ | लेखापरिक्षक श्रेणी-१ | १ |
| ३ | लेखापरिक्षक श्रेणी-२ | ३ |
| ४ | उपलेखापरिक्षक | २ |
| ५ | कनिष्ठ लिपीक | ६ |
| ६ | शिपाई | १ |
| | **एकूण** | **१४** |

२. उपरोक्त अटींचे पालन करण्याची जबाबदारी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

३. उपरोक्त अस्थायी कर्मचाऱ्यांसाठी होणारा खर्च संबंधित सहकारी पणन संस्थांकडून लेखापरिक्षण शुल्काद्वारे वसुल करण्यात यावा.

४. उपरोक्त बाबींवरील खर्च मागणी क्रमांक २४२५-सहकार-१०१-सहकारी संस्थांचे लेखापरिक्षण, १०१-(एक)(ए) लेखापरिक्षणासाठी कर्मचारी वर्ग (२४२५०२२७) या लेखाशिर्षाखाली दाखविण्यात यावा व त्याखाली सन २०१५-१६ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१३१६५४०६४४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Baburao Tumbare

Digitally signed by Sunil Baburao Tumbare
DN: CN = Sunil Baburao Tumbare, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Corporation marketing and Textile
Date: 2015.05.13 16:55:11 +05'30'

**( सु. बा. तुंबारे )**
अवर सचिव

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. कृषी पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

३. अप्पर निबंधक ( लेखापरिक्षण), सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. विभागीय सहनिबंधक ( लेखापरिक्षण), सहकारी संस्था, पुणे
५. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर,
६. जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, शेतकरी सहकारी संघ मर्या., कोल्हापूर,
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर,
९. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
१०.कार्यासन अधिकारी, ५ स / १२ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.